**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील महत्वाच्या स्थळांचा विकास करणे याअंतर्गत सामनगांव, ता. जिल्हा नाशिक गट नं.१८२ मध्ये बुध्दविहाराच्या बांधकामासाठी अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१६/प्र.क्र.६०७/बांधकामे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ मावक/बौविवसांकें/प्रस्ताव/प्र.क्र.८९/२०१६/का-१२/७२३, दि.२२/९/२०१६.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/ प्र.क्र.६२५/ बांधकामे, दि.१०/१/२०१७.

## प्रस्तावना :-

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच महत्वाच्या सांस्कृतिक व ऐतिहासीक स्थळांचा विकास करण्याच्या दृष्टीने स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहित कार्यपध्दतीनुसार संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी सामनगांव, ता. जिल्हा नाशिक गट नं.१८२ मध्ये बुध्दविहाराच्या बांधकामासाठी, ग्राम पंचायत सामनगाव, ता. जि. नाशिक यांच्याकडून सादर करण्यात आलेला रु. ९१,६७,८८५/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर अंदाजपत्रकात बुध्दविहार, रेस्टहाऊस, प्रसाधनगृह व बागबगीचा प्रस्तावित आहे. सदर अंदाजपत्रक उपविभागीय अभियंता, दक्षिण सा.बां.उप विभाग, नाशिक यांनी तयार केले असून, कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, नाशिक यांनी सांक्षांकित केले आहे. मा.मंत्री,(सा.न्या.व वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या दि. २०/१०/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली. याबाबतचे आदेश संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तद्नुषंगाने सदर प्रस्तावाच्या रु. ९१,६७,८८५/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी ग्राम पंचायत सामनगाव, ता. जि. नाशिक यांच्या बौध्दविहार बांधकामाच्या रु. ९१,६७,८८५/- इतक्या रक्कमेच्या खर्चाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेकरिता शासनाकडे पाठविले आहे. त्यामध्ये ४ टक्के आकस्मिक खर्च (३,६६,७१५/-) , ६ टक्के सेवाकर(५,७२,०७६/-), तसेच १० टक्के भाववाढीकरिता (९,५३,४६०/-) तरतूद करुन सदर कामाच्या एकूण रु. १,१०,६०,१३६/- (रुपये एक कोटी दहा लक्ष साठ हजार एकशे छतीस फक्त) इतक्या

अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने मान्यता दर्शविली आहे. त्यानुसार (रु. १,१०,८७,१२६/-)इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयांत नमूद अटीच्या तसेच खाली नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. एकूण अंदाजपत्रकीय खर्चामध्ये शासनाचा हिस्सा ९० टक्के इतका व संबंधित संस्थेचा हिस्सा १० टक्के इतका असेल. :-

१) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे. अंदाजपत्रकावर अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या वतीने सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक यांचे साक्षांकन घेण्यात यावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पांचा नमुना नकाशा, वास्तु-मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेण्यात यावी. तसेच प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजूरी घेण्यात यावी.

३) प्रकल्पाचे काम सुरु करण्यापूर्वी सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४) या कामी शासन निर्णय क्र. बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/बांधकामे, दिनांक १६/१२/२०१५ च्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीने नियमानुसार ई-निविदा प्रक्रिया राबवुन बांधकाम यंत्रणा निश्चित करुन काम हाती घ्यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) प्रस्तुत प्रकल्पाचे बांधकाम सा.बां.विभागाने विहीत केलेल्या मानकानुसार, विहीत दर्जाचे व गुणवत्तेचे राहील, याकरीता प्रकल्पाची सा.बां.वि.च्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत नियतकालीक तपासणी करुन घेणे आवश्यक राहील.

७) प्रस्तुत प्रकल्पातील इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

८) प्रस्तुत प्रकल्पातील बांधकामाचा कालावधी निश्चित करुन ते विहीत वेळेतच पूर्ण होईल, याची सबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण यांनी दक्षता घ्यावी.

९) प्रकल्पाच्या देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी ही ग्राम पंचायत सामनगाव, ता. जि. नाशिक यांची राहील

१०) प्रस्तुत प्रकल्पामध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

२. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन ग्राम पंचायत, सामनगांव, ता.जि. नाशिक यांनी हाती घेतलेल्या प्रकल्पावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सदर शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तर समितीची राहील. परिच्छेद ३ मध्ये नमूद सर्व

अटी ग्राम पंचायत सामनगाव, ता. जि. नाशिक यांना मान्य असल्याबाबत करारपत्र करुन घ्यावे. शासनाच्या वतीने करारपत्रावर सही करण्यासाठी विभागीय समाजकल्याण अधिकारी, नाशिक विभाग, नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक यांनी प्रकल्पाच्या बांधकामाच्या सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळीच सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३ यावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ६राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२),स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ -सहाय्यक अनुदाने(वेतनेतर)(योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक,आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ (२) मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समजाकल्याण, पुणे यांची राहील.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग- पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरहु शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०३२९१२५४१९२२२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.03.29 12:58:48 +05'30'

**(अ.कों. आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२ उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३ मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
४ अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
५ कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
६ महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७ प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक.
८ सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक.
९ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नाशिक.
१० निवडनस्ती.